**नवेगांव-नागझिरा आणि मेळघाट प्रकल्पांसाठी विशेष व्याघ्र संरक्षण दलाची (STPF) स्थापना या योजनेखालील निर्माण करण्यात आलेली २२४ अस्थायी पदे सन २०१८-१९ मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : - डब्ल्यूएलपी-०३.१८/प्र.क्र. १०६/फ-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०६ ऑक्टोबर, २०१८

**वाचावे :-**

१. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-३/योजनेतर/ प्र.क्र. ५६/(१६-१७)/२२०१, दिनांक :- २६.०२.२०१८.
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक :- पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क दिनांक :- ०५.०३.२०१८.
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक : - डब्ल्यूएलपी ०३१८/प्र.क्र.१०६ /फ-१, दिनांक :- २७.०३.२०१८.
४. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक:- पदनि- २०१६/ प्र.क्र.०८/ आ.पु.क., दिनांक :- ०७.०९.२०१८.

**शासन निर्णय :-**

नवेगांव-नागझिरा आणि मेळघाट प्रकल्पांसाठी विशेष व्याघ्र संरक्षण दलाची (STPF) स्थापना या योजनेखालील निर्माण करण्यात आलेल्या २२४ अस्थायी पदांना सन २०१८-१९ मध्ये दिनांक ०१.०३.२०१८ ते दिनांक २८.०२.२०१९ पर्यत चालू ठेवण्याचा अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक १ च्या पत्रान्वये सादर केला आहे. **वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक २ च्या शासन निर्णयानुसार** प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार नवेगांव-नागझिरा आणि मेळघाट प्रकल्पांसाठी विशेष व्याघ्र संरक्षण दलाची (STPF) स्थापना या योजनेखालील निर्माण करण्यात आलेल्या २२४ अस्थायी पदांना संदर्भ क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये सन २०१८-१९ मध्ये **दिनांक ०१.०३.२०१८ ते दिनांक ३०.०९.२०१८ पर्यत** मुदत वाढ देण्यात आली आहे.

आता **संदर्भ क्रमांक ४ च्या वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये** सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना **दिनांक ०१.१०.२०१८ ते दिनांक २८.०२.२०१९ पर्यंत** मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक १ च्या पत्रान्वये नवेगांव-नागझिरा आणि मेळघाट प्रकल्पांसाठी विशेष व्याघ्र संरक्षण दलाची (STPF) स्थापना या योजनेखालील निर्माण करण्यात आलेल्या २२४ अस्थायी पदांना सन २०१८-१९ मध्ये दिनांक ०१.०३.२०१ ८ ते दिनांक २८.०२.२०१९ पर्यत चालू ठेवण्याकरीता सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन **वित्त विभागाच्या संदर्भ ४ च्या शासन निर्णयान्वये** प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये नवेगांव-नागझिरा आणि मेळघाट प्रकल्पांसाठी विशेष व्याघ्र संरक्षण दलाची (STPF) स्थापना या योजनेखालील निर्माण करण्यात आलेल्या २२४ अस्थायी पदांना **दिनांक ०१.१०.२०१८ ते दिनांक २८.०२.२०१९** पर्यत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. नवेगांव-नागझिरा आणि मेळघाट प्रकल्पांसाठी विशेष व्याघ्र संरक्षण दलाची (STPF) स्थापना या योजनेखालील निर्माण करण्यात आलेल्या २२४ अस्थायी पदांच्या आस्थापनेवर होणारा खर्च २४०६- वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवांचे संवर्धन पंचवार्षिक योजनांतर्गत योजना केंद्र पुरस्कृत योजना, (००) ०४ व्याघ्र प्रकल्प (६० टक्के) (२४०६ १२४३) व २४०६, वनीकरण व वन्यजीवन ११० वन्यजीवांचे संवर्धन पंचवार्षिक योजनांतर्गत योजना राज्य योजना (००) (२१) व्याघ्र प्रकल्प (४०% राज्य हिस्सा) (सर्वसाधारण) (४०६ ए१०२) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. असंक - १००४ / प्र.क्र.१२ /(भाग-२) /२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०४.१०.२००४ व क्रमांकः- पदनि २०१६/ प्र.क्र.०८/१६/ आ.पु.क., दिनांक :- ०७.०९.२०१८ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००६१५४७३८८०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Deshbhratar

Digitally signed by Swapnil Deshbhratar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, cn=Swapnil Deshbhratar
Date: 2018.10.06 15:49:34 +05'30'

**(स्वप्निल देशभ्रतार)**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग.

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) , पुर्व नागपूर.

५. मुख्य वनसंरक्षक व क्षेत्रसंचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती.
६. वनसंरक्षक व क्षेत्रसंचालक, नवेगांव-नागझिरा व्याघ्र प्रकल्प, गोंदिया.
७. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
८. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवड नस्ती ).

**शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक डब्ल्यूएलपी ०३.१८/प्र.क्र. १०६ /फ-१,**
**दिनांक :-०६ ऑक्टोंबर २०१८ सोबतचे विवरणपत्र.**
**(दिनांक :- ०१.१०.२०१८ ते दिनांक :- २८.०२.२०१९ या कालावधीसाठी मुदतवाढ दिलेली पदे)**

| अ.क्र | पद | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | सहाय्यक वनसंरक्षक | २ |
| २ | वनक्षेत्रपाल | ६ |
| ४ | वनरक्षक | १६२ |
| ५ | वन निरिक्षक | ५४ |
| | एकूण | २२४ |

*******